# प्रस्तावना



राजेरजवाडे व श्रीमंत लोक आपल्या विश्रांतीचा वेळ मजेंत जावा म्हणून थट्टेखोर मनुष्य पदरीं बाळगितात. संस्कृत नाटकांत जीं थट्टेखोर पात्रें आहेत, त्यांवरून ही चाल फार प्राचीन काळापासून आपल्या देशांत चालत आली आहे असें दिसून येतें. अशा प्रकारच्या थट्टेखोर मनुष्यांपैकीं तेनालीराम या नांवाचा एक मनुष्य, दक्षिण हिंदुस्थानांत होऊन गेला. ह्याचा जन्म मद्रास इलाख्यांतील कृष्णा जिल्ह्यांत तेनाली नांवाच्या गांवीं झाला व ह्याला विजयानगरच्या राजानें आश्रय दिला होता. हें राज्य एवढें मोठें होतें कीं, त्यानें आपल्या भरभराटीच्या वेळीं दक्षिण हिंदुस्थानचें दक्षिणार्ध व्यापलेलें होतें. 'तेनालीरामा'च्या नांवावर पुष्कळ गोष्टी प्रसिद्ध आहेत. परंतु त्यांपैकीं कांहीं तरुणांनीं वाचण्यालायक नाहींत, व कांहीं सुशिक्षित लोकांच्या अभिरुचीस पात्र होण्याजोग्या नाहींत; अशा प्रकारच्या गोष्टी ह्या पुस्तकांत घेतल्या नाहींत.

अर्थात्, हें पुस्तक लहानथोर सर्व दर्जाच्या स्त्रीपुरुषांनीं वाचण्यालायक व्हावें, अशाबद्दल काळजी घेण्यांत आलेली आहे.

शेवटीं, ज्या जगन्नियंत्याच्या कृपेनें ही सभाषेची अत्यल्प सेवा माझे हातून घडली, त्याचे अत्यंत आभार मानून ही प्रस्तावना पुरी करितों.

मुक्काम-आजगांव, संo सावंतवाडी.
नारायण लक्ष्मण गोवेंकर.
पुस्तककर्ता.



# थट्टेखोर तेनालीराम याच्या मनोरंजक गोष्टी.

---

## गोष्ट १ ली.

### देवीचा वर.

मद्रास इलाख्यांत तेनाली नांवाच्या गांवांत एका ब्राह्मणास एक मुलगा झाला. त्या ब्राह्मणानें त्याचें नांव राम असें ठेविलें. ह्या मुलास एकदां वाटेंत एक संन्यासी भेटला. आमच्या चिमुकल्या रामाचें सौंदर्य व हुशारी पाहून, तो संन्यासी फार खूष झाला व त्यानें त्याला एक मंत्र दिला, आणि ह्मणालाः–'मुला, तूं देवीच्या देवळांत जा, आणि एका रात्रींत तीन कोटी वेळ ह्या मंत्राचा जप कर; ह्मणजे देवी प्रसन्न होऊन तुला दर्शन देईल. मग तूं तिच्या भयंकर स्वरूपास न भितां पाहिजे तो वर मागून घे.' नंतर चांगली संधि पाहून जवळच असणाऱ्या देवीच्या देवळांत राम गेला. आणि संन्याशानें सांगितल्याप्रमाणें त्या मंत्राचा त्यानें जप केला. तेव्हां देवी प्रगट झाली. तिला एक हजार तोंडें असून हात दोनच होते, व एकंदर स्वरूप फारच भयंकर दिसत होतें. तें तिचें स्वरूप पाहून राम मुळींच भ्याला नाहीं. एवढेंच नव्हे, तर तो तिच्याकडे पाहून एकसारखा हंसूं लागला.

तो आपल्याकडे पाहून हंसत आहे, असें पाहून देवीस फार राग आला, व तिनें हंसण्याचें कारण विचारिलें. तेव्हां राम ह्मणालाः—'आई, आह्मां मनुष्यांस फक्त एक नाक व दोन हात असतात. तथापि जेव्हां पडसें येतें, तेव्हां हें एक नाक पिळतां पिळतां हात अगदीं थकून जातात; आणि तुझ्याकडे पहावें, तर तुला एक हजार नाकें असून हात फक्त दोनच आहेत. ह्मणून तुला जर एखादे वेळीं पडसें झालें, आणि ह्या तुझ्या एक हजार नाकांतून वाहूं लागलें, तर तुझ्या दोन हातांचा तुला कांहींच उपयोग होणार नाहीं. हा विचार मनांत आल्यामुळें मला हंसूं आलें.' हें धैर्याचें व विनोदी उत्तर ऐकून देवी फार खूष झाली व ह्मणाली:— 'मुला, ज्या अर्थी तूं माझी असें सुरेख भाषण करून थट्टा केलीस, त्या अर्थी तूं थट्टेखोर ह्मणून मोठ्या योग्यतेस चढशील, व तुझ्या गुणावर सर्व लोक खूष होऊन जातील, असा मी तुला वर देतें.' असें ह्मणून देवी गुप्त झाली. तेव्हांपासून रामाची कीर्ति वाढत जाऊन शेवटीं विजयानगरच्या राजानें एक मोठें वेतन देण्याचें ठरवून त्यास आपलेकडे ठेविलें. अशा रीतीनें आपला थट्टेखोर तेनालीराम राजाच्या सहवासांत दिवस घालवूं लागला.

---

## गोष्ट २ री.

### त्यानें आपलें तोंड लपविलें.

एके वेळीं तेनालीरामानें फार थट्टा केल्यावरून

राजा रागावून त्यास ह्मणालाः—'मूर्खा, येथून चालता हो, पुनः तोंड दाखवूं नकोस.' त्याप्रमाणें तो तेथून चालता झाला; परंतु लौकरच एक रुंद तोंडाचें भांडें आपल्या डोक्यास घालून व अशा रीतीनें आपलें तोंड लपवून राजासमोर हजर झाला आणि राजास ह्मणालाः—'महाराज, आतां माझें तोंड आपल्यास खात्रीनें दिसणार नाहीं.' आपल्या हुकुमांतून सुटण्याकरितां त्यानें केलेली युक्ति पाहून राजास फार हंसूं आलें व त्यानें त्यास क्षमा केली.

## गोष्ट ३ री.

### तेनालीरामापेवजीं पहारेकऱ्यांस शिक्षा होते.

एकदां कृष्णलीला नांवाचा खेळ करणारी एक मंडळी राजाकडे आली. तेव्हा राजानें आपल्या वाड्यांत खेळ करण्यास सांगितलें. बाहेरून खेळाचे जागां जाण्यासाठीं दोन दरवाजे लागत असत. तेनालीराम कांहीं तरी घोंटाळा करील ह्मणून दोनही दरवाजांवरील पहारेकऱ्यांनीं त्याला आंत घेऊं नये, असा राजानें हुकूम केला. खेळास सुरुवात झाल्यावर तेनालीराम पहिल्या दरवाजावरील पहारेकऱ्याकडे आला, व 'मला आंत गेल्यास बराच फायदा होणार आहे.' असें त्यास सांगून आंत सोडण्याविषयीं विनंति करूं लागला. त्यावर पहारेकरी ह्मणूं लागलाः—'तुला जो फायदा होणार आहे, त्याचा अर्धा हिस्सा मला देण्याचें कबूल करीत असल्यास सोडतों.' त्याप्रमाणें तेनाली-

रामानें कबूल करून तो आंत गेला व दुसऱ्या पहारेकऱ्यापाशींही आपल्या फायद्याचा अर्धा हिस्सा देण्याची कबूली करून त्याही दरवाजांतून खेळ चालला होता त्या ठिकाणीं आला. त्यानें येतांना आपल्या बरोबर दही घुसळण्याची रवी लपवून आणिली होती. ह्या रवीनें कृष्णाचें सोंग घेणाऱ्या इसमावर त्यानें जोराचा एक तडाका दिला. त्यामुळें तो हाय, हाय, ह्मणत मोठ्यानें ओरडूं लागला. तेव्हां तेनालीराम ह्मणालाः— 'काय ? हाच का कृष्ण ! कृष्णाला तर गवळणींनीं आपल्या रवीनें कितीतरी वेळां मारलें आहे. असें असून माझ्या रवीचा एक सुद्धां तडाका याला सहन होत नाहीं. हे कसें ?' हा मध्येंच चाललेला गोंधळ पाहून राजानें तेनालीरामास पकडून चोवीस फटके मारा असा हुकूम केला. त्याप्रमाणें हुकूम बजावण्याकरितां सेवक त्याला बाहेर नेत असतां पहारेकरी भेटला. तेव्हां तेनालीराम त्याला ह्मणालाः—'मला जें मिळेल त्याचा अर्धा हिस्सा तुला पाहिजेना ?' त्यावर त्याजकडून 'होय' असें उत्तर येतांच, 'मला २४ फटक्यांची शिक्षा झाली आहे, सबब तुला बारा फटके घेतले पाहिजेत.' असें ह्मणून त्यानें त्याप्रमाणें बारा फटके या पहारेकऱ्यास मारावयास लाविले. नंतर दुसऱ्याही पहारेकऱ्यास त्याचप्रमाणें बारा फटके मारावयास लावून आपण एकही फटका न घेतां सुटून गेला.

## गोष्ट ४ थी.

### तरवारीनें ठार मारण्याची तेनालीरामास शिक्षा होते.

एके दिवशीं तेनालीरामानें राजाची फार थट्टा केली, त्यामुळें राजा रागावला व त्यानें दोन शिपायांस बोलावून आणून त्यास त्यांच्या ताब्यांत दिला. आणि त्यांस ह्मणाला:–' ह्या पाजी मनुष्यास घेऊन जा, आणि आपल्या तरवारीनें ह्याचें डोकें उडवा.' हुकुमाप्रमाणें शिपायांनीं तेनालीरामास बाहेर नेउन त्याला ठार मारण्याची तयारी चालविली. तेव्हां मोठ्या काकुळतीस येऊन तो त्यांस ह्मणाला:–' तुह्मीं तर मला आतां ठार मारणारच. तरी कृपा करून मला जवळच्या तळ्यांत जाऊन दोन घटका शेवटची ईश्वराची प्रार्थना करूं द्या. गळयास पोहोंचे एवढ्या पाण्यांत मी उभा रा तों, व तुह्मी आपल्या नंग्या तरवारी घेऊन माझ्या दोन्ही बाजूस उभे रहा. प्रार्थना संपतांच मी तुह्मांस कळवीन. मग क्षणाचाही विलंब न लावतां माझें मस्तक उडवा. मरतेवेळीं माझे हाल होऊं नयेत याकरितां मेहरबानी करून दोघेही मिळून एकदम व झपाट्यानें माझ्या मस्तकावर वार करा.' हें सर्व ह्मणणें शिपायांनीं कबूल करून त्याला तळ्यांत नेऊन उभें केलें. तेनालीरामानें आपली प्रार्थना संपवून मारण्याविषयीं सूचना केली. त्याप्रमाणें ते तरवार उचलून आतां त्याला ठार करणार, इतक्यांत तो झटकन पाण्यांत

बुडाला, व शिपायांचे वार एकमेकांस लागून ते स्वतःच ठार झाले. नंतर लौकरच तेनालीराम राजासमोर हजर झाला. राजानें मोठ्या आश्चर्यानें ' कसा सुटून आलास? ' ह्मणून त्यास विचारलें असतां त्यानें पुढें लिहिल्याप्रमाणें थोडक्यांत उत्तर दिलें. ' मूर्ख बेटे ! त्यांनीं मला सोडलें आणि एकमेकांस मारून टाकलें. '

---

## गोष्ट ५ वी.

### हत्तीच्या पायीं देऊन तुडवून मारावा, अशी तेनालीरामास शिक्षा होते.

एकदां तेनालीरामानें राजाची फार थट्टा केली; त्यामुळें राजास फार राग आला. त्यानें आपल्या सेवकांस बोलावून, ' तेनालीरामास हत्तीच्या पायीं देऊन ठार मारा ' असा त्यांस हुकूम केला. राजसेवकांनीं त्याला गांवाबाहेर एका मैदानांत नेला व एक खळगा ह्मणून त्यांत त्याला गळ्यापर्यंत पुरून टाकला. मस्तक मात्र जमिनीच्या वर होतें. तें तुडवून टाकाय ह्मणून हत्ती आणण्यासाठीं ते परत गांवांत आले. दरम्यान ज्याच्या पाठीस कुबड आलें आहे, असा एक धोबी त्या मैदानांतून जात असतां त्यानें तेनालीरामास पाहिलें व पुरून घेण्याचें कारण विचारलें. त्यावर तेनालीराम ह्मणालाः—' पुष्कळ दिवसांपासून माझ्या पाठीस कुबड आलेलें होतें. मी पुष्कळ उपाय केले, परंतु गुण येईना. शेवटीं सुदैवानें मला एक चांगला वैद्य भेटला.

त्यानें या ठिकाणीं मला आणून अशा रीतीनें पुरून टाकलें. त्यामुळें कुबड जाऊन माझी पाठ आतां अगदीं सरळ झालेली आहे. मला वर काढ म्हणजे माझें म्हणणें खरें आहे, अशी तुझी खात्री होईल.' त्या धोब्यानें खड्डा खणून तेनालीरामास वर काढलें, व त्याची पाठ अगदीं सरळ झाली आहे, असें पाहून आपलेंही कुबड नावें अशा हेतूनें आपणाला पुरण्याविषयीं त्यानें तेनालीरामास विनंति केली. त्या विनंतीप्रमाणें त्या धोब्यास गळ्यापर्यंत पुरून टाकून व त्याचें कपड्याचें गाठोडें आपण घेऊन तेनालीराम स्वतः राजासमोर हजर झाला. त्याला पाहून राजानें विचारलें:-'काय? सेवकांनीं तुला मारलें नाहीं?' त्यावर तेनालीराम शांतपणें म्हणाला:-'महाराज, मारण्याचा हुकूम आला होता खरा, परंतु एका परोपकारी धोब्यानें माझ्या ऐवजीं आपण स्वतः राहून माझी सुटका केली. जास्त पुराव्यासाठीं हें त्याचें कपड्याचें ओझें मी आणलेलें आहे.' हें ऐकून राजास फार हंसूं आलें व त्यानें तेनालीरामास शिक्षा माफ केली.

---

## गोष्ट ९ वी.

### पाहिजे ती थट्टा करण्याची त्यानें पूर्ण मोकळीक मिळविली.

एके दिवशीं तेनालीराम स्वतःशींच म्हणाला:-' मी थट्टा केली म्हणजे राजाचा पुरोहित व राजा हे वारंवार चिडतात व मला भयंकर शिक्षा करितात. मी आजपा-

र्यंत मोठ्या युक्तीनें जरी ह्या शिक्षा चुकविल्या, तरी एखादे वेळेस त्यांत सांपडून प्राणसुद्धां जाण्याची पाळी येईल. यासाठीं यांतून मुक्त होण्याकरितां कांहीं तरी कायमची तजवीज केली पाहिजे.' असें ह्मणून तो त्या तयारीस लागला. पुष्कळ दिवसपर्यंत राजाच्या पुरोहिताशीं गोडीगुलाबीनें वागून त्यानें त्याची प्रीति संपादन केली. नंतर एके दिवशीं तो त्या पुरोहितास ह्मणालाः—' उत्तर हिंदुस्थानांतून आमच्या घरीं एक ब्राह्मण आपल्या पंधरा वर्षांच्या मुलीसह आला आहे. ही मुलगी इतकी सुंदर आहे कीं, सौंदर्यांत हिची बरोबरी करणारी एकही स्त्री साऱ्या पृथ्वींत सांपडणार नाहीं, असें मला वाटतें.' पुरोहित ह्मणालाः—' असें आहे, तर तिच्याशीं माझें लग्न होईल अशी तजवीज कर.' तेनालीराम ह्मणालाः—' ही गोष्ट होणें अशक्य आहे. कारण, ती बापाची फारच आवडती असल्यामुळें आपल्या इच्छेप्रमाणें तिनें नवरा पसंत करावा, अशी त्याची इच्छा आहे. ह्यामुळें तिच्या बापाची भेट घेऊन कांहीं फायदा नाहीं. बरें, प्रत्यक्ष मुलीशीं ह्या बाबतींत बोलावें असें ह्मटलें, तर तीही गोष्ट जुळणार नाहीं. कारण, ती कोणत्याही पुरुषाचें दर्शनसुद्धां घेऊं इच्छित नाहीं. मग बोलायाला ती कशी बरें कबूल होईल? अशा प्रकारची जरी अडचण आहे, तरी तुह्मी स्त्रीवेष घेत असाल तर तिची व तुमची भेट होईल, अशी कांहीं तरी युक्ति मी करीन. मग प्रत्यक्ष तुह्मींच ति-

घ्याकडे लग्नाची गोष्ट काढावी.' ह्या म्हणण्यास पुरोहित कबूल झाला. त्यानें दुसऱ्या दिवशीं स्त्रीवेष घेऊन तेनालीरामाच्या घरीं जावें असें ठरलें. नंतर तेथून तेनालीराम निघाला तो राजाकडे आला व पुरोहितास ज्याप्रमाणें त्यानें सांगितलें होतें, त्याप्रमाणें राजालाही सांगितलं. अशा मुलीशीं आपण लग्न करावें अशी राजास इच्छा होऊन, तोही स्त्रीवेष घेऊन तेनालीरामाच्या घरीं येण्यास कबूल झाला. नंतर दुसऱ्या दिवशीं रात्रीं अगोदर पुरोहित ठरल्याप्रमाणें वेषांतर करून आला. त्याला तेनालीरामानें एका खोलींतील पलंगावर बसविलें व 'तुमच्या भेटीसाठीं मुलीस लौकरच पाठवून देतों,' असें सांगितलें. कांहीं वेळानें राजाही स्त्रीवेषानें आला. त्याला पुरोहित ज्या खोलींत होता ती खोली तेनालीरामानें दाखविली व तो म्हणाला:— 'या खोलींत मुलगी तुमची वाट पाहत राहिली आहे, तरी आपण आंत जाऊन तिच्याशीं पाहिजे तें बोलावें.' त्याप्रमाणें राजा आंत गेल्यावर तेनालीरामानें बाहेरून कडी लावून घेतली. राजा व पुरोहित हे (प्रत्येक असामी दुसरा मुलगी आहे असें समजून) एकमेकांची लग्न करण्याविषयीं प्रार्थना करूं लागले. याप्रमाणें बोलणें चाललें असतां, त्यांनीं एकमेकांस ओळखिलें व मनांत फार खट्टू झाले. त्यांना तेनालीरामाचा फारच राग आला. मग दरडावून कडी काढावयास तेनालीरामास त्यांनीं सांगितलें. तो त्यांच्या ह्या दरडावणीस न भितां

कांहीं वेळ स्वस्थ राहिला. आपण दाखविलेल्या भीतीस तेनालीराम जुमानीत नाहीं, असें पाहून त्यांनीं कडी काढण्याबद्दल प्रार्थना चालविली. तेनालीराम त्यांस म्हणालाः–'तुम्हांपैकीं प्रत्येक असामीचे मी रोज शंभर अपराध केले तरी ते माफ करूं, असें तुम्ही शपथपूर्वक सांगत असाल तर कडी काढतों.' तेव्हां नाइलाज होऊन दोघांनींही त्याप्रमाणें सांगितलें. नंतर तेनालीरामानें कडी काढली व घडलेल्या गोष्टीबद्दल अनेक वेळ माफी मागितली. इतकें झाल्यावर राजा व पुरोहित मुकाट्यानें आपापल्या घरीं जावयास गेले.

---

## गोष्ट ७ वी.

### शिंगरूं कसें पाळलें

एकदां राजानें कांहीं शिंगरें आणलीं व तीं सर्व गांवांतील प्रत्येक घरास एक याप्रमाणें वांटून टाकलीं. शिंगराच्या सर्व प्रकारच्या खर्चासाठीं बाळगणारास सरकारांतून दरमहा तीन होन द्यावे, असा राजानें हुकूम केला. त्यामुळें प्रत्येक मनुष्यानें आपणास मिळालेल्या शिंगराची जोपासना फार चांगली चालविली. तेनालीरामानें सर्व बाजूंनीं बंद अशी एक खोली तयार करून त्यांत त्या शिंगरास न बांधतां मोकळें सोडलें आणि त्याच्या तोंडासमोर भिंतीस एक भोंक पाडलें व आंतल्या बाजूस एक लहानसा खळगा पाडला. तो स्वतः सकाळ-संध्याकाळ त्या खोलीकडे येई व भोंका-

वाटे एक मूठभर गवत त्या शिंगरास देऊन, खळग्यांत पाणी ओतून जाई. या युक्तीनें वरील तीन होनांपैकीं फारच थोडा अंश शिंगरास देवून बाकीचा सर्व आपल्या स्वतःच्या कामीं लावीत असे. याप्रमाणें बरेच दिवस गेल्यावर 'सर्वांनीं आपापलीं शिंगरें घेऊन आपल्यासमोर हजर व्हावें' अशी राजानें सर्वांस ताकीद दिली. हुकुमाप्रमाणें सर्वांनीं आपापलीं शिंगरें आणिलीं. तीं फारच सुरेख दिसत होतीं. यावरून सर्व शिंगरें फार चांगल्या रीतीनें पाळलीं जात आहेत असें दिसून आलें. तनालीरामानें मात्र आपलें शिंगरूं आणलें नव्हतें. तुझें शिंगरूं कोठें आहे ? असें राजानें विचारलें असतां तो म्हणालाः—' महाराज, तें फारच मस्त झालें आहे. कोणीही मनुष्य त्याच्याकडे नुसता जाण्याससुद्धां शकत नाहीं. मग त्याला धरण्याची तर गोष्टच बोलायला नको. याकरितां मेहरबानीं करून तुमच्याकडे असलेल्या पहिलवानांपैकीं एक उतम पहिलवान माझ्या मदतीस द्या; म्हणजे त्याच्या सहाय्यानें मी त्याला धरून आणतों.' राजा म्हणालाः—' कांहीं हरकत नाहीं. तुला वाटेल तो पहिलवान घेऊन जा.' नंतर तेनालीरामानें एक लांब दाढीचा मुसलमान पहिलवान या कामीं पसंत करून त्यास घेऊन तो आपल्या घराकडे आला व खोलीकडे येऊन ' भोंकांतून शिंगरूं पहा ' असें त्यानें त्या पहिलवानास सांगितलें. त्याप्रमाणें भोंकांत तोंड घालून तो पाहत असतां शिंगरास आपलें

रोजचें खाणें आलें ' असें वाटून दाढी तोंडांत धरून तें हिसके मारूं लागलें. आपली दाढी कांहीं केलें तरी सुटत नाहीं, असें पाहून पहिलवान मोठ्या दुःखानें ओरडूं लागला. हें पाहून तेनालीराम धावत धावत राजाकडे आला, आणि ह्मणालाः–' महाराज, शिंगरानें दाढीस धरून त्या पहिलवानास पकडून ठेविलें आहे. फार उपाय केले, पण सोडीत नाहीं. त्या बिचाऱ्याची प्राण जाण्याची वेळ आली आहे, तरी मेहरबानी करून त्याला लौकर सोडवायला चला. ' हें ऐकून राजा कांहीं लोक घेऊन ताबडतोब त्या ठिकाणीं आला व पहिलवान दाढी सुटण्याबद्दल धडपड करीत दुःखानें ओरडत आहे, असें पाहून भिंती पाडून त्याची मुक्तता करण्याबद्दल हुकूम केला. त्याप्रमाणें भिंती पाडून पहिलवानास सोडविण्यांत आलें. पण ज्या शिंगरानें एवढा मोठा अनर्थ केला, त्याला आपल्या पायांवर उभें राहण्याइतकीसुद्धां शक्ति नाहीं, असें पाहून राजास आश्चर्य वाटलें व तो तेनालीरामास ह्मणालाः–' तूं ह्या शिंगरास पाहिजे तितकें खाणें घातलें नाहींस, याबद्दल तुला शिक्षा देणें योग्य आहे. ' त्यावर तेनालीरामानें ताबडतोब उत्तर दिलें:–' महाराज, ह्याला मी जरी फारच थोडें खाणें घालतों, तरी पण हें किती मस्त आहे बघा. तुमच्याकडील अति उत्तम पहिलवानासमुद्धां तें आवरत नाहीं. मीं जर ह्यास भरपूर खाणें घातलें असतें तर ह्याला पकडन नेण्याकरितां तुह्मांला एकही पहिलवान

मिळाला नसता.' हें उत्तर ऐकून राजासह सर्व मंडळी हंसूं लागली.

## गोष्ट ७ वी.

### ब्राह्मणांस डागले.

राजाची आई मरावयास टेकली असतां तिला आंबा खाण्याची फार इच्छा झाली. परंतु तो आणण्यापूर्वींच तिचा प्राण निघून गेला. आपल्या आईची शेवटची इच्छा तृप्त करितां आली नाहीं, म्हणून राजास फार वाईट वाटून, कांहीं ब्राह्मणांस त्यानें बोलावून आणलें व तो म्हणाला:—' मरतेवेळीं माझे आईला आंबा खाण्याची इच्छा झाली; परंतु तो आणण्यापूर्वीच ती मरण पावली. यासाठीं तिच्या आत्म्यास तृप्त करण्यास काय उपाय करावा तें सांगा.' ब्राह्मण म्हणाले:-सोन्याचे आंबे करून ते तिच्या वर्षश्राद्धाचे दिवशीं ब्राह्मणास दान करावे; म्हणजे तिचा आत्मा तृप्त होईल.' राजाला तें खरें वाटून त्याप्रमाणें त्यानें दान केलें. दुसऱ्या दिवशीं तेनालीरामानें आपल्या आईचें वर्षश्राद्ध आहे, असें सांगून वरील दान घेतलेल्या ब्राह्मणांस आपल्या घरा बोलावून नेलें आणि तापलेल्या लोखंडाच्या पळीनें प्रत्येक ब्राह्मणास दोन दोन ठिकाणीं डाग दिले. त्यामुळें ते रडत रडत राजाकडे फिर्याद घेऊन आले. राजानें तेनालीरामास बोलावून ' आणून असें राक्षसी कृत्य कां केलेंस' म्हणून विचारलें. तेव्हां तो म्हणाला:— ' महाराज, माझी आई वायूच्या विकारानें वरचेवर

आजारी पडत असे. या रोगानें ती आजारी पडली ह्मणजे तापविलेल्या लोखंडी पळ्यांनीं तिला कांहीं ठिकाणीं आह्मीं डाग देऊं; आणि असें केलें ह्मणजे तिला बराच गुण येई. एके वेळीं हा विकार फारच वाढला, तेव्हां 'डाग द्या, डाग द्या,' असा तिनें एकसारखा घोष चालविला व आह्मीही त्याकरितां तयारी करीत आहों, इतक्यांत तिचा प्राण निघून गेला. ही तिची इच्छा तृप्त करण्याकरितां हें कृत्य केलें.' हें ऐकून ब्राह्मण ह्मणाले:– 'असें कसें होईल ? आह्मांस डागलें तर तें मृत मनुष्यास कसें पोहोंचेल ?' त्यावर तेनालीराम ह्मणाला:– 'ज्या अर्थीं मृत मनुष्यास आंबे पोहोंचतात, त्याअर्थीं डाग पोहोंचावयास मुळींच हरकत नाहीं.' हें उत्तर ऐकून राजास फार हंसूं आलें व ब्राह्मण लट्टू होऊन निघून गेले.

## गोष्ट ९ वी.

### मांजर कसें पाळलें ?

एकदां राजानें आपल्या शहरांतील प्रत्येक घरास एक गाय व एक मांजर दिलें; आणि गाईचें दूध काढून तें सर्व मांजरास द्यावें असा हुकूम केला सर्वजण गाईचें दूध काढून तें मांजरास देत असत. तेनालीरामानें दूध स्वतःला मिळावें ह्मणून पुढें लिहिल्याप्रमाणें युक्ति केली. त्यानें पहिल्याच दिवशीं दूध काढल्यावर तें तापत ठेवलें, आणि चांगलें तापल्यावर भांडें उचलून लागलेंच मांजरापुढें ठेविलें. हें मांजर फारच लहान होतें, त्यामुळें

प्रत्यक्ष स्पर्श केल्याशिवाय थंड व ऊन यांतील फरक त्यास समजण्यासारखा नव्हता. म्हणून दूध पिण्यासाठीं मोठ्या आशेनें ह्या तापलेल्या भांड्यांत त्यानें तोंड घातलें. त्याबरोबर त्याचें तोंड अगदीं भाजून गेलें व तें ओरडत लांब पळून गेलें. ह्या प्रसंगामुळें त्या मांजरास इतकी दहशत बसून गेली कीं, यापुढें दूध दृष्टीस पडतांच तें भिऊन पळून जात असे. सहा महिन्यांनंतर सर्व मांजरें आपल्यासमोर आणण्याविषयीं राजानें हुकूम केला. तेनालीरामाशिवाय इतर सर्व जणांचीं मांजरें सुरेख व गोजिरवाणीं दिसलीं. तेनालीरामाचें मात्र अगदीं रोडकें व मरणाच्या पंथास लागलेलें दिसलें. हें पाहून राजा तेनालीरामास म्हणालाः–' ज्याअर्थीं ह्या मांजराची अशी स्थिति झाली आहे, त्याअर्थीं तूं याला मुळींच दूध दिलें नाहींस असें वाटतें.' तेव्हां तेनालीराम म्हणालाः–' महाराज, मी काय बरें करावें? हें मांजर दूध पहातांच पळून जातें. त्यामुळें माझा नाइलाज आहे.' हें ऐकून राजानें ताबडतोब दूध आणून तें त्या मांजरासमोर ठेवण्याचा हुकूम केला. दूध पाहतांच मांजर भिऊन लांब पळून गेलें. त्यामुळें राजास फार आश्चर्य वाटलें व हें असें भिऊन कां पळतें, याबद्दल कांहींच कल्पना करितां न आल्यामुळें तेनालीरामासच त्याचें कारण विचारलें. तेव्हां त्यानें आपण केलेली युक्ति सांगितली. ती ऐकून सर्व मंडळी हंसूं लागली.

---

## गोष्ट १० वी.

### एका मोठ्या पंडिताचा पराभव केला.

एके दिवशीं अनेक शास्त्रांत पारंगत असा **विद्यासागर** नांवाचा एक मोठा पंडित राजाकडे आला. त्याची विद्वत्ता पाहून राजाचे दरबारांतील पंडित अगदीं भिऊन गेले. ह्या संकटांतून निभावून जाण्याकरितां तेनालीराम कांहींतरी युक्ति काढील, अशा आशेनें ते त्याजकडे गेले व त्यास ह्मणाले:– ' हा नवीन आलेला पंडित फारच विद्वान आहे. तो वादविवादांत आह्मांस सहज जिंकून टाकील; आणि त्यामुळें आमची सर्वांची मानखंडना होऊन, शिवाय राजाही आह्मांवर फार रागावेल. याकरितां ह्या संकटांतून मुक्त होण्यासाठीं एखादी युक्ति काढा.' तेनालीराम ह्मणाला:–' तुह्मीं निर्धास्त असा. त्याला जिंकण्याची मीं कांहींतरी युक्ति काढतों.'

नंतर ठरलेल्या दिवशीं **विद्यासागर पंडित** वादविवादाकरितां राजदरबारीं आला. तेनालीरामानें अगोदरच कांहीं वाळलेलीं पानें घेतलीं व तीं ह्मैस बांधण्याच्या दोरीनें बांधिलीं व त्यावर कपडा घालून त्याला पुस्तकासारखा आकार दिला. हें पुस्तकासारखें दिसणारें पुडकें बरोबर घेऊन तो **विद्यासागर** पंडितासमोर येऊन बसला. तें पुस्तकच आहे असें समजून त्या पंडितानें तेनालीरामास विचारलें:-' ह्या पुस्तकाचें नांव काय ?' तेनालीराम ह्मणाला:– ' **शुष्क-पर्ण-महिषी-बन्धनम्** '

हें नांव ऐकून तो पंडित घोटाळ्यांत पडला व स्वतःशीं ह्मणाला:–' मी पुष्कळ शास्त्रांचा अभ्यास केला; तथापि ह्या पुस्तकाचें नांवसुद्धां माझ्या पाहण्यांत आलें नाहीं.' तो अशा प्रकारें मोठ्या विचारांत पडला आहे, असें पाहून तेनालीराम त्यास ह्मणाला:–' तुह्मी पुष्कळ शास्त्रांचें अध्ययन केलें असून एका मोठ्या प्रसिद्ध शास्त्रासंबंधाचें हें पुस्तक तुमच्या कधींच पाहण्यांत आलें नाहीं काय?' यावर तो पंडित ह्मणाला:–' ह्या प्रश्नाचें उत्तर मी तुह्मांस उद्यां देईन.' असें ह्मणून तो आपल्या बिऱ्हाडीं निघून गेला. तेथें गेल्यावर तेनालीरामाच्या पुस्तकासंबंधानें त्यानें बराच विचार केला; परंतु त्याला कांहींच सुचेना. शेवटीं, तो आपल्याशींच ह्मणाला:–' त्या पुस्तकाच्या नांवाचासुद्धां मला जर बोध होत नाहीं, तर मग त्यांत ज्या विषयाचें प्रतिपादन केलें आहे, तो विषय कसा समजणार? एकंदरींत येथें जर मी राहिलों तर अज्ञान पदरीं येऊन अब्रू जाईल. ह्याकरितां येथून एकदम निघून जावें हें बरें.' असा विचार करून कोणालाही न कळवितां तो पंडित निघून गेला. हें वर्तमान राजास कळतांच त्यानें तेनालीरामास बोलावून आणलें व ' कोणत्या युक्तीनें त्या पंडितास तूं पळविलेंस ' असें त्यास विचारलें. त्यावर तेनालीराम ह्मणाला:–' महाराज, ह्या माझ्या ' शुष्क-पर्ण-महिषी-बन्धनम् ' नांवाच्या पुस्तकाच्या सहाय्यानें मीं त्याला पळविलें. राजा ह्मणाला:–' सोड पाहूं तें पुस्तक.' तेनालीरामानें

पुस्तक सोडून दाखविलें. तेव्हां म्हैस बांधण्याच्या दोरीनें चाललेली पानें बांधून तें तयार केलें आहे, असें दिसून आलें आणि त्या चमत्कारिक नांवाचा अर्थही सर्वांच्या ध्यानांत आला. अशा प्रकारें विद्वानास जिंकण्याची ही अपूर्व तऱ्हा पाहून राजासह सर्व मंडळी हंसूं लागली.

---

## गोष्ट ११ वी.

### चोरांकडूनसुद्धां फायदाच करून घेतला.

एके दिवशीं रात्रीं सहा चोर, चोरी करण्याच्या उद्देशानें तेनालीरामाच्या घराच्या मागच्या बाजूस येऊन लपून राहिले. तेनालीरामास त्यांची चाहूल लागली, आणि त्यांचा उद्देशही त्याचे ध्यानीं आला. मग घरांत येऊन चोरांस ऐकूं येईल, अशा आवाजानें तो बायकोस म्हणाला:–' हल्लीं आपल्या गांवांत चोरांचा फारच सुळसुळाट झाला आहे. वरचेवर चोऱ्या होत आहेत; म्हणून अगोदरच आपण सावधगिरी ठेवावी हें फार चांगलें. यासाठीं पैसाअडका, दागदागिने वगैरे सर्व मूल्यवान् वस्तु एका पेटींत आतांच घालून ती आपल्या विहिरींत टाकूं आणि चोरांची भीति नाहींशी झाल्यावर ती वर काढूं म्हणजे झालें. ' हें बोलणें बाहेरून चोरांनीं ऐकलें. तेनालीरामानें एका पेटींत दगड, लांकडाचे तुकडे वगैरे निरुपयोगी वस्तु घालून ती गच्च भरली आणि आपण स्वतः, बायको व मुलगा या तिघांनीं मिळून ती उचलून विहिरींत ढक-

[illegible] [illegible]. त तीं निर्भेळी परत घरांत आली. चोरांना [illegible] तें आपलें काम सहज झालें आणि त्यांनीं विहिरींतील पेटी काढून घेऊन जाण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें कांहीं असामी विहिरींत उतरल्यावर थोडेंसें पाणी उसपल्याशिवाय पेटी हातास लागणार नाहीं, असें त्यांस दिसून आलें. नंतर सर्वांनीं मिळून पाणी उसपण्याचा बेत करून, त्यासाठीं जवळच असणारें सर्व साहित्य घेऊन कामास लागले. तेव्हां तेनालीराम हळूच त्यांना नकळत बागेंत आला, आणि त्यानें तें पाणी बागेंतील झाडांस लाविलें. चोरांनी [illegible] त्यामुळें किती दमट [illegible] पाहिजे नाहीं. पहांटेच्या सुमारास तेनालीराम मोठ्यानें ओरडून त्यांस ह्मणाला:- बागेंतील सर्व झाडांस भरपूर पाणी मिळालेलें आहे. आतां जास्त उसपण्याची तसदी घेऊं नका. हें ऐकून आपण पकडले गेलों नाहीं, यांतच संतोष मानून चोर पळून गेले.

---

## गोष्ट १२ वी.

### काळ्या कुत्र्यास पांढरा करण्याचा प्रयत्न.

एके दिवशीं सकाळीं आठ वाजेपर्यंत राजा आपल्या बिछान्यावर निजून राहिला. तो दिवस राजाची हजामत करण्याचा होता, ह्मणून हजाम आला व राजा निजला आहे असें पाहून तशा स्थितींत त्याची

त्यानें फार कुशलतेनें हजामत केली व तो निघून गेला. राजा जागा झाल्यावर त्यानें आपलें रूप आरशांत पाहिलें. तेव्हां आपणाला नकळत हजामानें फारच चांगली हजामत केली आहे असें त्यास समजून आलें. नंतर हजामाला बोलावून आणून आपण फार खूष झालों आहें, तरी काय पाहिजे तें माग, असें त्यास सांगितलें. तेव्हां हजाम ह्मणालाः--' महाराज, मला माझ्या धंद्याचा व जातीचा कंटाळा आला आहे. यासाठीं मला मेहरबानीकरून ब्राह्मण करा. राजानें कांहीं हरकत नाहीं, असें ह्मणून कित्येक ब्राह्मणांस बोलावून आणिलें व तो त्यांस ह्मणालाः--' जर सहा महिन्यांचे आंत तुह्मीं ह्या हजामास ब्राह्मण करून त्याचेबरोबर अन्नव्यवहार वगैरे केला नाहीं, तर तुमच्या इनाम जमिनी सरकारांत घेतल्या जाऊन वर्षासनेंही बंद केलीं जातील.' ब्राह्मणांनीं मोठ्या नाखुषीनें त्या हजामास ब्राह्मण करण्याचें कबूल करून त्याला आपल्या बरोबर नेलें. नंतर ब्राह्मणास आवश्यक असणारीं स्नानसंध्या इत्यादि कर्मे त्याला शिकविण्यास त्यांनीं आरंभ केला; परंतु त्याचे बरोबर अन्नव्यवहार मात्र केला नाहीं. सहा महिने संपल्यावर हजामास ब्राह्मण केला कीं काय तें पाहण्यासाठीं आपण येणार आहें, असें राजानें ब्राह्मणांस कळविलें. हें ऐकून ब्राह्मण मोठ्या संकटांत पडले. ह्यांतून मुक्त करण्याकरितां तेनालीरामाची त्यांनीं प्रार्थना केली. तेव्हां तेनालीरामानें भिऊं नका,

आपण कांहीं तरी युक्ति काढितों, असें सांगितलें. नंतर त्यानें एक काळा कुत्रा आणिला. त्याला दोरीनें बांधून, त्याला आणि कांहीं ब्राह्मणांस बरोबर घेऊन तो राजवाड्यानजीक असणाऱ्या तळ्यावर गेला. नंतर ब्राह्मणांस अग्निकुंड तयार करून मंत्र ह्मणावयास सांगून आपण कुत्र्या घेऊन तळ्यांत गेला, आणि त्याला चांगला धुऊन पुसून फरफटत ओढीत अग्निकुंडाजवळ आणिला. तेथेंच त्या सभोंवतीं त्याला कांहीं प्रदक्षिणा करावयास लावून पुनः फरफटत ओढीत तळ्यांत नेला. ह्याप्रमाणें अग्निकुंडाकडून तळ्यांत व तळ्यांतून अग्निकुंडाकडे त्याला ओढीत नेण्याचा तेनालीरामानें क्रम चालविला हें कृत्य त्या कुत्र्यास फारच त्रासदायक झाल्यामुळें त्याची एकसारखी ओरड चालली होती. कुत्रा एकसारखा कां ओरडतो आहे हें पहाण्यासाठीं राजा बाहेर आला, तेव्हां तेनालीरामानें सर्व कृत्य पाहिलें व ह्या गरीब प्राण्यास असा त्रास का देतोस, ह्मणून त्याला विचारिलें. तेव्हां तेनालीराम ह्मणालाः-' महाराज, मला एका कुत्र्याची जरूरी आहे, असें माझ्या एका मित्रास मी कळविल्यावरून त्यानें हा काळा कुत्रा पाठवून दिला. काळा रंग मला आवडत नाहीं, ह्मणून ब्राह्मणांकडून मंत्र ह्मणवून आणि धुऊन पुसून याला पांढरा करावा, अशा हेतूनें मी हें कृत्य करीत आहें. हें ऐकून राजा ह्मणालाः-' अरे, मूर्खा! अशा प्रकारें तूं हजारों ब्रा-

ह्मणांचें साह्य घेऊन वर्षानुवर्षे जरी ह्या कृत्यास धूत राहिलास तरी हा काळ्याचा पांढरा होणार नाहीं. करितां हा मूर्खपणाचा प्रयत्न सोडून दे.' तेनालीराम ह्मणालाः–' तुमचा विचार मला अगदीं पसंत नाहीं. ब्राह्मणांचें साह्य घेऊन असें मी करीत राहिलों, तर हा कुत्रा काळ्याचा पांढरा खात्रीनें होईल. कारण, ब्राह्मण हजामाला ब्राह्मण करूं शकतात, तर मग काळ्याचा पांढरा कां बरें करूं शकणार नाहींत ?' हें उत्तर ऐकून राजा उमजला आणि त्यानें हजामास ब्राह्मण करण्याकरितां दिलेला हुकूम रद्द केला.

## गोष्ट १३ वी.

### चित्रें काढण्याची विलक्षण तऱ्हा.

एकदां राजानें एक सुरेख वाडा बांधिला आणि एका चित्रकारास बोलावून आणून त्यास ह्या नवीन बांधलेल्या वाड्यांतील भिंतीवर सुरेख चित्रें काढावयास सांगितलीं. त्याप्रमाणें चित्रांचें काम पुरें झाल्याचें राजास कळविण्यांत आलें. नंतर राजा आपणाबरोबर बरीच मंडळी घेऊन चित्रें पहावयास आला. बरोबर आलेल्या मंडळींत तेनालीरामही होता. चित्रें पहात असतां बाजूनें काढलेलें एक चित्र तेनालीरामाच्या दृष्टीस पडलें. तेव्हां त्यानें राजास सहज विचारिलें:– 'महाराज, ह्या चित्राचे एका बाजूकडील सर्व अवयव दिसतात; पण बाकीचे अवयव कोठें आहेत? राजा ह्मणालाः–' तुला जे अवयव दिसणार नाहींत ते भि-

तीच्या तुमच्या बाजूस आहेत अशी कल्पना कर.' हें उर्मटपणाचें उत्तर ऐकून तेनालीरामास वाईट वाटलें; परंतु त्यावेळीं तो उगी राहिला. ह्या गोष्टीस कांहीं दिवस झाल्यावर एके दिवशीं तेनालीराम राजास म्हणाला:—' तुमच्या नव्या वाड्यांतील चित्रें पाहिल्यापासून मला चित्रकलेचा फार नाद लागला आहे व तेव्हांपासून मी त्या कलेचा अभ्यास करीत असतों. हल्लीं माझी त्यांत बरीच गति झालेली आहे. महाराजांची परवानगी असल्यास मी आपलें कौशल्य दाखविण्यास तयार आहें.' राजास ही गोष्ट खरी वाटली व त्याच्या एका वाड्यांतील चित्रें फार जुनीं झालीं होतीं, सबब तीं काढून टाकून त्यांच्या जागीं नवीन चित्रें काढण्यास तेनालीरामास त्यानें हुकूम केला. तेनालीरामानें वाडा रिकामा करून आपल्या ताब्यांत घेतला; आणि जुनीं चांगलीं चित्रें पुसून टाकलीं. नंतर त्यानें एका जागीं एक आंगठा, तर दुसऱ्या जागीं एक डोळा, तर तिसऱ्या जागीं एक नाक, अशा प्रकारें काढलेल्या ओबडधोबड अवयवांनी तो वाडा अगदीं भरून टाकला. नंतर तो राजाकडे गेला आणि म्हणाला:—' माझें चित्रें काढण्याचें काम पुरें झालें आहे, तरी पाहण्याची कृपा करावी.' त्याप्रमाणें राजा आपल्याबरोबर कांहीं मंडळी घेऊन त्या इमारतींत आला आणि जिकडेतिकडे ओबडधोबड अवयव काढलेले पाहून रागानें म्हणाला:—
' तेनालीराम, चित्रांचे बाकीचे अवयव कोठें आहेत!'

( १ ) $ पहिल्यानें अतिशूराच्या उजव्या हाताचीं बोटें तुडून तो हात तसाच उचलून आपल्या छातीवर मोठ्या जोरानें मारला.

( २ ) ‡ नंतर त्याचे दोनही हात उचलले व त्या हातांचे तळवे आपल्या दोन्ही खांद्यावर ठेविले.

( ३ ) ¶ इतकें झाल्यावर त्यानें आपल्या हाताचें बोट मानेसभोंवतीं फिरविलें व तो हात तसाच कंबरेपर्यंत खालीं आणून त्याचा तळवा खालच्या बाजूस केला.

( ४ ) § आणि शेवटीं आपला उजवा हात थोडासा वर उचलून हालविला.

अतिशूरानें ह्या सर्व खुणा पाहिल्या व त्यांवर बराच विचार केला; परंतु त्यांचा अर्थ ध्यानांत येईना. कुस्ती खेळण्याच्या ज्या शास्त्रीय खुणा आजपर्यंत तो शिकला होता, त्या सर्वांशीं आतांच्या खुणा त्यानें ताडून पाहिल्या, परंतु व्यर्थ. तेनालीराम कांहीं वेळ

$ ह्या खुणेचा अर्थ 'अतिशूरा, तूं जर माझ्या छातींत एक ठोसा मारलास' असा होतो.

‡ 'तर मी खालीं पडून मरेन' अशा अर्थी या खुणेचा उपयोग केला आहे.

¶ हिंदुलोकांत लग्नाचे वेळीं नवरीचे गळ्यांत मंगळसूत्र बांधतात आणि तें तिनें नवरा जिवंत असेपर्यंत कायम ठेविलें पाहिजे. म्हणून मानेसभोंवती बोट फिरवून त्याचे योगानें 'मूल' या शब्दाचा बोध केला. या खुणेचा एकंदर अर्थ 'बायको व मूल' असा आहे.

§ 'कोण' असा प्रश्न विचारण्याकरितां या खुणेचा उपयोग केला आहे.

स्वस्थ बसला. तितक्या वेळांत अतिशूरास खुणांचा अर्थ सांगतां येत नाहीं अशी राजाची व इतर लोकांची खात्री झाली. नंतर तेनालीरामानें अतिशूराकडील अजिंक्यपत्रें काढून घेतलीं व मोठ्या जयघोषानें आपल्या तंबूंत प्रवेश केला. दुसऱ्या दिवशीं राजानें तेनालीरामास बोलावून आणून त्या खुणांचा अर्थ विचारला. तेव्हां त्यानें त्या खुणा परत करून दाखविल्या व पुढें लिहिल्याप्रमाणें त्यांचा अर्थ सांगितला:-' अरे अतिशूरा, तूं जर माझ्या छातींत एक ठोंसा मारलास तर मी खालीं पडून मरून जाईन. मग माझ्या बायकोचें व मुलांचें संरक्षण कोण करील?' हा अर्थ ऐकून राजासह सर्व मंडळी हंसूं लागली.

---

## गोष्ट १८ वी.

### राजाचें वचन कसोटीस लाविलें.

एके दिवशीं तेनालीराम फारच दुःखी दिसला; ह्मणून राजानें त्यास विचारलें. 'तूं असा दुःखी कां? तुला कशाची जरूर आहे?' तेनालीराम ह्मणाला:- 'महाराज, एकदोन महिन्याचे आंत मी मरणार असें ज्योतिषानें भविष्य केलें आहे. मला स्वतःच्या मरणाबद्दल कांहीं दुःख वाटत नाहीं; परंतु मी मेल्यावर माझें कुटुंब उघडें पडून त्यांतील मनुष्यांस फार हालांत दिवस काढावे लागणार. हा विचार मनांत येऊन फारच दुःख होतें.' राजा ह्मणाला:-' त्याबद्दल तूं दुःखी होऊं नकोस. तुझ्यामागें तुझ्या कुटुंबाचा सांभाळ मी

चांगल्या रीतीनें करीन.' याप्रमाणें वचन देऊन राजानें त्याचें समाधान केलें. नंतर तेनालीरामानें आपण सीक पडलों असून दिवसेंदिवस अशक्त होत चाललों आहें, असें ढोंग केलें. एके दिवशीं त्यानें सोनें, दागदा-गिनें, पैसाअडका वगैरे मूल्यवान् जिनसा ठेवण्याची आपली पेटी रिकामी केली, आणि त्या जिनसा दुसरी-कडे मोठ्या बंदोबस्तानें ठेविल्या. नंतर त्यानें आपण मेलों अशी खोटी बातमी सर्व गांवभर उठविली व आपण वरील पेटींत लपून बसला. तेनालीरामाकडे बरेंच द्रव्य आहे ही गोष्ट राजास माहित होती. तो मेल्याची बातमी त्याचे कानावर येतांच, त्याचें द्रव्य बरेंच उपटावें ह्या हेतूनें त्यानें आपल्या शिपायांस बोलावून आणून तेनालीरामाची द्रव्याची पेटी ताबडतोब आणा, असा त्यांस हुकूम केला. त्याप्रमाणें शिपायांनीं ती पेटी राजापुढें आणून ठेविली. राजानें द्रव्याच्या आशेनें तावडतोब पेटी उघडण्याचा हुकूम केला. त्या-प्रमाणें ती उघडल्यावर त्यांत द्रव्याऐवजीं तेनालीराम दिसला. त्याला पाहून राजा आश्चर्यानें ह्मणतोः—' सर्व लोकांत तेनालीराम मेल्याची बातमी पसरली आहे, आणि तूं तर जिवंत आहेस हें कसें ?' तेनालीराम ह्म-णालाः—' मी मरणार होतों, परंतु माझ्या कुटुंबाचा भार तुमच्यासारख्या धनलोभी राजावर ठेवणें योग्य नाहीं, असें वाटल्यावरून मी जिवंत राहिलों आहें. माझ्या कुटुंबाचा सांभाळ करणारा तुमच्याऐवजीं दुसरा योग्य मनुष्य मिळतांच मी मरणार.' हें उत्तर ऐकून राजा फार लज्जित झाला व तावडतोब तेथून निघून गेला.